200407191343020001-2500

**अभिलेखात असणा-या वडीलांच्या नावाच्या स्तंभासोबत आईच्या नावाचाही स्तंभ ठेवण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग
परिपत्रक क्र. संकीर्ण-१०९८/प्र.क्र. ३२५/का-२
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ३० नोव्हेंबर , १९९९.

**परिपत्रक**

महाराष्ट्र राज्यात महिलांवर होणा-या अत्याचारांना आळा घालण्यासाठी शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक : एमआयएस-०६९५/स्टेट ३/पोल-१३, दि. २४ जून १९९६ अन्वये अपर मुख्य सचिव (गृह), महाराष्ट्र शासन यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन केलेल्या कृतीदलाच्या दि. २३ सप्टेंबर, १९९९ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयापैकी एक निर्णय असा आहे की, शाळा, महाविद्यालये, रुग्णालये, जन्म-मृत्यू नोंदणी, शिधा वाटप पत्रिका, रोजगार विनिमय केंद्रात नोंदणी, लोकसेवा आयोगाच्या परिक्षा इत्यादी बाबतच्या आवेदनपत्रावर तसेच अन्य शासकीय / निमशासकीय कागदपत्रांवर / अभिलेखावर वडिलांच्या नावाचा स्तंभ असतो आणि त्यात संबंधिताच्या वडीलांचे नाव नमूद करावयाचे असते. अशा प्रकारच्या सर्व आवेदनपत्रावर / कागदपत्रावर / अभिलेखावर संबंधितांच्या वडीलांच्या नावाच्या स्तंभाबरोबरच संबंधितांच्या आईच्या नावाचाही स्तंभ ठेवण्यात यावा आणि त्यामध्ये संबंधितांच्या वडीलांच्या नावाबरोबरच त्यांच्या आईचेही नाव नमूद करण्याचे बंधनकारक करावे.

२ वरील निर्णयाची नोंद सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी घेऊन त्याची तात्काळ अमलबजावणी करावी तसेच त्यांच्या नियंत्रणाखालील तसेच त्यांच्याशी संबंधित असणा-या सर्व शासकीय / अर्धशासकीय विभाग, कार्यालये आणि महामंडळे / मंडळे / समित्या आणि स्वायत्त संस्था यांच्याही निदर्शनास वरील निर्णय आणून त्याची त्यांच्याकडून अंमलबजावणी होईल असे पहावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( जॉयस शंकरन )
सचिव, महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग

प्रति,
राज्यपाल यांचे सचिव.
मुख्यमंत्री यांचे सचिव.
उपमुख्यमंत्री यांचे सचिव

सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई ( पत्राने )
प्रबंधक, मुळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई ( पत्राने )
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग ( पत्राने )
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
महालेखापाल, मुंबई,
महालेखापाल, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व मंत्रालयीन प्रशासनिक विभाग,
संचालक, महिला व बाल विकास संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना , कोकण भवन, नवी मुंबई.
महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती, का-२